# महाराष्ट्र शासन

ई-मेल द्वारे

**क्र.एफएलडी-२०९३/प्र.क्र.५५९/फ-१०**
**महसूल व वन विभाग,**
खो क्र. ४५७/४६० विस्तार
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक: -०७ जून, २०२४

**विषय:- वनजमिन-सातारा**

महाबळेश्वर येथील बॉम्बे पॉईट येथील ०.०१८१ हे. वनक्षेत्र १३ स्टॉलधारकांना स्टॉल चालविण्यासाठी भाडेपट्ट्याचा दर निश्चित करणेबाबत...

**संदर्भ:-** १) शासन ज्ञापन क्र. एफएलडी-२०९३/प्र.क्र.५५९/फ-१०, दि २८.०५.२०१२
२) केंद्रस्थ अधिकारी यांचे पत्र क्र. कक्ष-१७/नोडल / कोल्हापूर / (५) / आयडी-१५६३ /१८५१/२०२१-२२, दि.२०.१२.२०२१.

**ज्ञापन:-**

उपरोक्त विषयाबाबत संदर्भाधीन क्र. २ येथील पत्रास अनुसरून मला आपणास असे कळविण्याचे निर्देश आहेत की, मा. न्यायालयांमध्ये दाखल असलेल्या याचिकांमधील निर्णयाच्या अधीन राहून महाबळेश्वर येथील बॉम्बे पॉईट येथील ०.०१८१ हे. वनक्षेत्रावरील १३ स्टॉलधारकांपैकी बंद असलेले स्टॉल क्र. ०९, ११ व १२ वगळून उर्वरीत स्टॉलधारकांना सन २०१०-२०११ साठी संदर्भाधीन क्र. १ येथील शासन ज्ञापन दिनांक २८.०५.२०१२ अन्वये मंजुर केलेले स्टॉलभाडे आधारभूत ठेवून त्यापुढील प्रत्येक वर्षाकरीता मागील वर्षाच्या भाड्यामध्ये ५ टक्के भाडेवाढ (सन २०११-१२ ते २०२३-२४) करुन सन २०२३-२४ पासून ११ महिन्याच्या (दि. ०१.१०.२०२३ ते दि. ३१.०८.२०२४) हंगामाच्या कालावधीच्या मान्यतेसह) खालील अटी व शर्तींच्या अधीन राहून स्टॉल चालविण्यास कार्योत्तर मान्यता देण्यात येत आहे.

| अ.क्र. | वर्ष व प्रस्तावित भाडेवाढ | प्रति स्टॉल रुपये |
|---|---|---|
| १ | सन २०१०-११ या वर्षाचे स्टॉल भाडे १३ स्टॉलसाठी प्रत्येकी (शासन ज्ञापन क्र. एफएलडी-२०९३/प्र.क्र.५५९/फ-१०) | ११,४६६/-<br>(प्रति दिन ४२ x ९ महिने (२७३ दिवस) |
| २ | सन २०११-१२ साठी प्रस्तावित भाडे - ५ टक्के वाढीने | १२,०३९/- (९ महिने) |
| ३ | सन २०१२-१३ साठी प्रस्तावित भाडे - ५ टक्के वाढीने | १२,६४१/- (९ महिने) |
| ४ | सन २०१३-१४ साठी प्रस्तावित भाडे - ५ टक्के वाढीने | १३,२७३/- (९ महिने) |
| ५ | सन २०१४-१५ साठी प्रस्तावित भाडे - ५ टक्के वाढीने | १३,९३७/- (९ महिने) |

| | | |
|---|---|---|
| ६ | सन २०१५-१६ साठी प्रस्तावित भाडे - ५ टक्के वाढीने | १४,६३४/- (९ महिने) |
| ७ | सन २०१६-१७ साठी प्रस्तावित भाडे - ५ टक्के वाढीने | १५,३६६/- (९ महिने) |
| ८ | सन २०१७-१८ साठी प्रस्तावित भाडे - ५ टक्के वाढीने | १६,१३४/- (९ महिने) |
| ९ | सन २०१८-१९ साठी प्रस्तावित भाडे - ५ टक्के वाढीने | १६,९४१/- (९ महिने) |
| १० | सन २०१९-२० साठी प्रस्तावित भाडे - ५ टक्के वाढीने | १७,७८८/- (९ महिने) |
| ११ | सन २०२०-२१ साठी प्रस्तावित भाडे - ५ टक्के वाढीने | १८,६७७/- (९ महिने) |
| १२ | सन २०२१-२२ साठी प्रस्तावित भाडे - ५ टक्के वाढीने | १९,६११/- (९ महिने) |
| १३ | सन २०२२-२३ साठी प्रस्तावित भाडे - ५ टक्के वाढीने | २०,५९२/- (९ महिने) |
| १४ | सन २०२३-२४ साठी प्रस्तावित भाडे - ५ टक्के वाढीने | २६,४६५/- (प्रति दिन ७९ x ११ महिने (३३५ दिवस) ( दि.०१.१०.२०२३ ते दि.३१.०८.२०२४) |

<u>अटी व शर्ती:-</u>

(१) पर्यटक हंगामात स्टॉलसाठी दिलेल्या जमिनीव्यतिरिक्त संबंधित स्टॉलधारकांनी त्यांच्या स्टॉलसमोरील जागा अनधिकृतपणे वापरु नये. जर तसे केल्याचे आढळून आल्यास त्या दिवसापासून परवाना त्वरीत रद्द करण्यात येईल व असे आदेश देण्याचा अधिकार उप वनसंरक्षक, सातारा यांना राहील.

(२) पुढील सन २०२४-२५ या वर्षी स्टॉलच्या परवान्याचे नुतनीकरण करण्यासाठी, स्टॉलधारकांना सन २०२३-२४, करिता आकारण्यात आलेल्या भाड्यामध्ये थेट ५% जादा भाडे आकारून त्याचा विचार करता येईल. मात्र स्टॉलधारकांनी तसा नूतनीकरण अर्ज संबंधित प्राधिकारी यांच्याकडे सादर करणे आवश्यक आहे.

(३) हंगाम संपल्यानंतर स्टॉलचे क्षेत्र मोकळे करुन वन विभागाच्या ताब्यात देणे बंधनकारक आहे. तसे न केल्यास त्यांच्याकडून रु.२०००/- (रुपये दोन हजार मात्र) दंड वसूल करुन परवाना रद्द करण्यात येईल.

(४) स्टॉलच्या मागील बाजूस असलेल्या जागेचा वापर स्टॉलधारकांना वाहनाच्या पार्किंगसाठी करता येणार नाही. असा वापर करावयाचा असेल तर त्यासंबंधी शासनाकडून रितसर परवानगी मिळविणे आवश्यक आहे. विनापरवानगी पार्किंग केल्यास परवाना रद्द करण्यात येईल.

(५) स्टॉलच्या नजीकच्या जागेस / वनास कोणत्याही प्रकारे आगी लागल्यास त्या विझवण्यास मदत न केल्यास तसेच प्रतिबंधात्मक उपाय योजना न केल्यास पुढील वर्षी परवानगी देण्यात येणार नाही.

(६) स्टॉलमध्ये कोणत्याही प्रकारच्या प्लास्टिक डिशेस, ग्लासेस वापरता येणार नाहीत. तसेच स्टॉल व स्टॉल परिसरात कचरा / घाण करता येणार नाही.

(७) रिट याचिका क्र.२७५४/१९९७ मधील निर्णातील अटी व शर्तीचे पालन करणे बंधनकारक राहील. याचवरोवर शासनाने वेळोवेळी घातलेल्या अटींचा भंग झाल्यास रु.२०००/- दंड आकारण्यात येईल व परवाना रद्द करण्यात येईल.

(८) स्टॉलधारक स्टॉलसाठी मंजुर केलेल्या जागेव्यतिरिक्त इतर जागेचा वापर करणार नाहीत, याची दक्षता मुख्य वनसंरक्षक (प्रा.), कोल्हापूर यांनी घ्यावी.

(९) स्टॉलधारकांकडून संपूर्ण थकीत रक्कम दिनांक ३१/०६/२०२४ पर्यंत वसूल करण्यात यावी. जर सदरची रक्कम दिनांक ३१/०६/२०२४ पर्यंत भरणा न केल्यास त्यांचे स्टॉल तात्काळ बंद करण्यात यावे व पुढील कालावधीसाठी परवाना नूतनीकरण करु नये.

(१०) मा. न्यायालयामध्ये दाखल विविध याचिकांमधील न्यायालयाच्या निर्णयातील अटी व शर्ती स्टॉलधारकांना बंधनकारक राहतील.

(११) सदरहू अटी व शर्तीचे यथायोग्य पालन संबंधित स्टॉलधारकांकडून होत आहे किंवा कसे, याचा वेळोवळी आढावा उपवनसंरक्षक, सातारा यांनी घ्यावा व त्याबाबतचा अहवाल केंद्रस्थ अधिकारी यांच्यामार्फत शासनास सादर करावा.

(१२) स्टॉल परवानाधारकानेच स्टॉल चालविणे बंधनकारक राहील. अन्य व्यक्तीस पोट भाड्याने स्टॉल चालविण्यासाठी दिल्यास परवाना रद्द करण्यात येईल.

(१३) वन (संरक्षण व संवर्धन) अधिनियम, १९८० चा भंग होणार नाही, याची काळजी स्टॉल परवानाधारकांनी घेणे आवश्यक आहे. वन (संरक्षण व संवर्धन) अधिनियम, १९८० चा भंग झाल्यास परवाना रद्द करण्यात येईल.

(१४) महाबळेश्वर मधील बॉम्बे पॉईट येथील ०.०१८१ हे. वनक्षेत्रावरील १३ स्टॉलधारकांपैकी बंद असलेले स्टॉल क्र. ०९, ११ व १२ चे क्षेत्र वन विभागाच्या ताब्यात घेण्यात यावे.

(१५) वरील अटी मान्य असल्याबाबतचे हमीपत्र स्टॉलधारकांकडून घेऊन स्टॉल संबंधिताच्या ताब्यात देण्यात यावा.

सदर शासन ज्ञापन महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२४०६१०१५४०२५२९१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

GANESH TUKARAM JADHAO

Digitally signed by GANESH TUKARAM JADHAO
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=REVENUE AND FOREST DEPARTMENT,
2.5.4.20=0078f58512d3ac01315bbbfa4b473ed7729dd2d31644106e2966ab9ee6e92d7d, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=6FEEDE606678D569A76B842319BD1C2969AA85BBA5CDCCEE147249F17965E8BB, cn=GANESH TUKARAM JADHAO
Date: 2024.06.10 15:55:25 +05'30'

**( गणेश जाधव )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति :-**

१) प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर
२) अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक व केंद्रस्थ अधिकारी, महाराष्ट्र राज्य, नागपूर
३) मुख्य वनसंरक्षक (प्रा.), कोल्हापूर
४) उप वनसंरक्षक, सातारा
५) निवडनस्ती.